“महाखादी कला सृष्टी-२०२४” प्रदर्शन आयोजनार्थ सर जे.जे. कला संचालनालय, मुंबई यांच्या खर्चाचे देयक अदा करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. मएक्स्पो-२०२४/ प्र.क्र.६६/ उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक २९/०८/२०२४

**संदर्भ** :- १. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. कार्या-०२/ खादी कला सृष्टी-२०२४/५००७, दिनांक २२/०३/२०२४.

२. उप मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. कार्या-०४/उद्योग/महाखादी एक्स्पो-२०२४/१६९५, दिनांक २२/०८/२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य खादी आणि ग्रामोद्योग मंडळ ही उद्योग विभागाच्या अखत्यारीतील खादी व ग्रामोद्योगांना प्रोत्साहन देण्यासाठी नोडल संस्था म्हणून कार्यरत आहे. त्यानुसार राज्यातील खादी आणि ग्रामोद्योगाचा वारसा जतन करण्याचे महत्त्वपूर्ण कार्य सदर मंडळाकडून करण्यात येते. यासंदर्भात सदर मंडळाकडून घेतल्या जाणा-या विविध पुढाकारांचा लाभ राज्याच्या ग्रामीण भागातील विविध वस्तूंचे उत्पादन करणारे हस्तकला, पारंपारिक कारागीर व उद्योजक, अनेक PMEGP/CMEGP युनिटधारक उद्योजकांना होतो.

२. राज्याच्या विविध भागातून मोठ्या संख्येने कारागीर, उद्योजक आणि संस्थांना त्यांची उत्पादने आणि कौशल्ये दाखविण्यासाठी व्यासपीठ प्रदान करण्यासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळातर्फे दिनांक १६ ते २५ फेब्रुवारी, २०२४ या कालावधीदरम्यान एमएमआरडीए ग्राऊंड, वांद्रे-कुर्ला कॉम्प्लेक्स येथे “महाखादी कला सृष्टी-२०२४” चे आयोजन करण्यात आले होते. सदर प्रदर्शनामध्ये महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, आदिवासी विकास विभाग, उद्योग संचालनालय, खादी व ग्रामोद्योग आयोग, एमएसआरएलएम इत्यादी विभागांनी सहभाग नोंदविला होता. तसेच सदर प्रदर्शनामध्ये १२७ स्टॉल्सची उभारणी करण्यात आलेली होती. राज्याच्या विविध भागातून मोठ्या संख्येने कारागीर/उद्योजक/ संस्था सहभागी होण्यासाठी तसेच अभ्यागतांना आकर्षित करण्यासाठी हा कार्यक्रम आयोजित करण्यात आलेला होता.

३. “महाखादी कला सृष्टी-२०२४” च्या आयोजनासंदर्भात मा. प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील प्रदर्शन समितीची बैठक दिनांक १२/०२/२०२४ रोजी संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार, सदर प्रदर्शन आयोजनासाठी कालावधी कमी असल्याने प्रदर्शन सजावट, आराखडा, स्टॉल बांधणी, प्रचार प्रसिद्धी साहित्य व डिजाईन व इतर अनुषंगिक कामकाज, उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दिनांक ०७/०६/२०२२ रोजीच्या शासन निर्णयानुसार, सर जे.जे. कला महाविद्यालय मुंबई यांच्यामार्फत करून घेण्यात आले. त्यानुसार सर जे.जे. कला संचालनालय, मुंबई या

संस्थेला खर्चाचे देयक अदा करण्याकरीता रुपये १ कोटी निधी उपलब्ध करून देण्याबाबत वरील संदर्भीय पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांनी विनंती केली आहे. त्यानुसार "महाखादी कला सृष्टी-२०२४" आयोजनार्थ सर जे.जे. कला संचालनालय, मुंबई या संस्थेला खर्चाचे देयक अदा करण्याकरीता रुपये १ कोटी निधी एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळामार्फत दिनांक १६ ते २५ फेब्रुवारी, २०२४ या कालावधीदरम्यान एमएमआरडीए ग्राऊंड, वांद्रे-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई येथे आयोजित करण्यात आलेल्या "महाखादी कला सृष्टी-२०२४" प्रयोजनार्थ, मा. प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली प्रदर्शन समितीने दिलेल्या मान्यतेनुसार, सर जे.जे. कला संचालनालय, मुंबई या संस्थेला खर्चाचे देयक अदा करण्याकरीता रुपये १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

२. उपरोक्त नमूद अनुदानाची रक्कम रुपये १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्याचे तसेच याबाबत मार्गदर्शन व पर्यवेक्षण करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांना देण्यात येत आहेत. सदर रकमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४ व त्यासोबतचे परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्याकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की, मुंबई येथे आयोजित केलेल्या "महाखादी कला सृष्टी-२०२४" प्रदर्शनामध्ये सजावट, आराखडा, स्टॉल बांधणी, प्रचार प्रसिद्धी साहित्य व डिजाईन, विषयानुरूप आयोजन, सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन इत्यादी संदर्भात मा. प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील प्रदर्शन समितीने दिनांक १२/०२/२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता प्रदान केलेली आहे. सदर लेखाशिर्षाखाली यापूर्वी सन २०२३-२४ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे विनियोग प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. तसेच यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/ महालेखापाल यांचे आक्षेप नाहीत.

४. सदर खर्च मागणी क्र.के-७, "२८५१ ग्रामोद्योग व लघु उद्योग (००) १०२ लघु उद्योग - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजना (००)(०३) औद्योगिक प्रदर्शनामध्ये व व्यापार जत्रांमध्ये भाग घेणे (२८५१ ०३९८) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ

क्र. २०४/ २०२४/ व्यय-१६, दिनांक २३/०७/२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र.२०२४०८२९१४२६०१६८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT,
2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2024.10.04 17:54:04 +05'30'

**( राजीव राजमाने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई. (पाच शाईच्या प्रती)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र- २, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई.
८) कार्यासन १४६१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) कार्यासन व्यय - १६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अवर सचिव (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती (उद्योग-७)